**वैशिष्ट्यपूर्ण योजनेतून हरित पट्टे विकास (Green Space Development) प्रकल्पाचे सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यासाठी मार्गदर्शक सूचना.....**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः नपावै-२०१७/प्र.क्र. ११३/नवि-१६**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: १५ जुलै, २०१७

**संदर्भ :-**

(१) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक-संकीर्ण-१०२०००/प्र.क्र.४०/ २०००/ नवि-०४, दिनांक २५ फेब्रुवारी, २०००
(२) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक-जीईएन-२००७/८७३/नवि-१६, दिनांक १६ फेब्रुवारी, २००८
(३) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक-जीईएन-२००७/८७३/ नवि-१६, दिनांक ०६ सप्टेंबर, २०१३

**प्रस्तावना -**

वैशिष्ट्यपूर्ण योजनेतून हरित पट्टे विकसित करण्यासाठी निधी वितरीत करण्यात येतो. त्या अनुषंगाने नगरपरिषदा/नगरपंचायती हरित क्षेत्र विकास प्रकल्पाचे सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्याच्या सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय -**

वैशिष्ट्यपूर्ण योजनेतून मंजूर करण्यात येणाऱ्या निधीतून हरित पट्टे प्रकल्प विकसित करण्याच्या प्रकल्पाचे सविस्तर प्रकल्प अहवाल तयार **करताना पुढीलप्रमाणे सूचनांची अंमलबजावणी करणे बंधनकारक राहील.**

१. वैशिष्ट्यपूर्ण योजनेतून हरित पट्टे प्रकल्प विकसीत करण्यासाठी आवश्यक असणारे सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यासाठी सल्लागारांची नियुक्ती करताना ज्या सल्लागाराने किमान ५ हरित क्षेत्र प्रकल्पांची यशस्वी अंमलबजावणी केली असेल अशा सल्लागारांमधून योग्य त्या सल्लागाराची नियुक्ती करण्यात यावी व त्यांच्यामार्फत पुढील मार्गदर्शक तत्वे विचारात घेऊन हरित पट्टे प्रकल्पांबाबतचा सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यात यावेत.

२. वैशिष्ट्यपूर्ण योजनेतून मंजूर करण्यात येणाऱ्या निधीतून हरित पट्टे प्रकल्प विकसित करताना **शहरांमधील हरित आच्छादनाचे १५ टक्के इतके उद्दीष्ट साध्य करणे आवश्यक आहे**. त्याअनुषंगाने हरित पट्टे प्रकल्प राबविताना हरित क्षेत्र वाढविणाऱ्या घटकांना जास्तीत जास्त प्राधान्य देण्यात यावे.

३. नगरपरिषदा/ नगरपंचायतींचा योजनाबध्द विकास आराखडा तयार करत असताना **हरित क्षेत्रांचा विकासासाठी राखून ठेवलेली ठिकाणे निश्चित** (Reserved for green cover / gardens) केलेली असतात. अशा क्षेत्रावर हरित क्षेत्रांचा विकास करण्याबाबतचे प्रकल्प प्रस्ताव प्रामुख्याने विचारात घ्यावेत.

४. हरित क्षेत्र विकासाचे प्रकल्प राबविण्यात येत असताना हरित कामांचे उदा.झाडांची लागवड याचे प्रमाण हे जास्त राहील याची दक्षता घेण्यात यावी. असे करताना :-

**(अ) प्रकल्प खर्चाच्या किमान ५० टक्के रक्कम फक्त हरितक्षेत्र विकसित करण्यावर म्हणजेच वृक्ष लागवडीवर खर्च होईल** या दृष्टीने नियोजन करणे आवश्यक राहील.

(ब) यामध्ये सर्वसाधारण **२ ते ३ वर्षाची झाडे ज्यांचा सरासरी व्यास हा २.५ ते ३ इंच** असेल अशा झाडांचा समावेश करावा. तसेच, रूपये ५० लक्ष किंमतीच्या **हरितक्षेत्र** प्रकल्पामध्ये **अंदाजे सरासरी किमान २५०० झाडे समाविष्ट होतील याची दक्षता घेण्यात यावी.**

५. हरित क्षेत्र विकासाचे प्रकल्प हाती घेताना सदर प्रस्तावामधील स्थापत्य (**सिव्हिल) कामांवरील खर्च हा २० टक्केपेक्षा जास्त करण्यात येऊ नये.**

**(अ)** वैशिष्ट्यपूर्ण योजनेतून नवीन बगीचा क्षेत्र विकसित करणार असल्यास त्यामध्ये कुंपन (कंपांउंड वॉल), पिण्याच्या पाण्याची सुविधा, पर्जन्यजल संचय सुविधा , शौचालय, कंपोस्ट प्लँट, वॉटर वर्कस, वॉचमन शेड, कचरापेटी, आवश्यकता असल्यास विद्युत जोडणी यापैकी आवश्यक असणाऱ्या कामांचाच समावेश करण्यात यावा. तथापि **सदर कामावरील खर्च हा उपरोक्तप्रमाणे नमूद केलेप्रमाणे प्रकल्प किंमतीच्या २० टक्केच्या मर्यादेत करण्यात यावा**.

ब) जुन्या बगीचा क्षेत्राचे पुर्नज्जीवन करताना स्थापत्य (**सिव्हिल)** कामाच्या बाबींचा समावेश यापेक्षा कमी राहील याची कृपया दक्षता घ्यावी.

६. **उर्वरीत ३० टक्के खर्च हा लॉन, वेली, छोटी झाडे यावर करता येईल**.

७. बगीचा क्षेत्र विकसित करताना **बगीचातील पदपथ, कमान इत्यादी कामे ही शक्यतो नैसर्गिक स्वरुपाची राहतील,** अशी दक्षता घ्यावी.

८. अशा हरित प्रकल्पामध्ये आवश्यक असणारी **इतर आयुधे जसे बेंचेस, खेळण्याची उपकरणे, व्यायामाची उपकरणे अशा विविध उपकरणांचा खर्च प्रकल्प किंमतीत समाविष्ट करण्यात येऊ नये.** सर्वसाधारणपणे अशा बाबींवरील खर्च **स्थानिक स्वराज्य संस्थांकडे इतर माध्यमातून उपलब्ध होणाऱ्या निधीतून तसेच सामाजिक दायित्व जबाबदाऱ्यांमधून (सी.एस.आर.) मिळविण्यात** यावा.

९. हरित क्षेत्र विकसित करताना संबंधित **शहरांमधील हवामान, पाण्याची उपलब्धता व भौगोलिक परिस्थिती विचारात घेवून सदर परिस्थितीमध्ये जगू शकतील अशा सावली देणारे, शोभिवंत आणि फळफळावळ देणाऱ्या वृक्ष प्रजाती** प्राधान्याने लावण्यात याव्यात. स्थानिक परिस्थितीनुरूप अन्य रोपांची निवड व लागवड करण्यास मोकळीक असेल. जेणेकरुन पशु-पक्षी यांचा अधिवास (Habitation) व अन्न साखळी (Food Chain) टिकून राहील आणि जैवविविधतेचे (Bio-Diversity) संरक्षण व संवर्धन होण्यास मदत होईल.

१०. सदर प्रकल्पांतर्गत झाडांचे जिवंत राहण्याचे प्रमाणे किमान ८० ते ९० टक्के असेल याद्दष्टीने रोपांचे संरक्षण करणे, पाणीपुरवठा, कायमस्वरुपी देखभाल व संगोपन याबाबत आवश्यक नियोजन करावे.

११. हरित क्षेत्र विकास प्रकल्पाच्या देखभाल व दुरुस्तीचा खर्च हा सविस्तर प्रकल्प अहवालामध्ये समाविष्ट करण्यात यावा. सदर प्रकल्पाचा देखभाल दुरुस्तीचा खर्चासाठी आवश्यक ती यंत्रणा संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी / शहरांनी विकसित करावी व त्याद्वारे सदर प्रकल्पासाठीचा देखभाल व दुरुस्तीचा खर्च भागविण्यात यावा.

१२. सदर हरित क्षेत्र विकास प्रकल्प विकसित करत असताना शासनाच्या सार्वजनिक बांधकाम विभागाचा उद्यान कक्ष व सामाजिक वनीकरण विभागाचे आवश्यक ते मार्गदर्शन घेण्यात यावे.

१३. सदर सविस्तर प्रकल्प अहवालांना सक्षम तांत्रिक प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता घेण्यात यावी.

१४. **नगरपरिषदांच्या/ नगरपंचायतीच्या हरित प्रकल्पांच्या अहवालास नजीकच्या महानगरपालिकेच्या शहर अभियंता यांच्याकडून तांत्रिक मान्यता घेण्यात यावी**.

१५. शहरातील १५ टक्के हरित आवरणाचे उद्दीष्ट साध्य करण्याच्या अनुषंगाने व वैश्विक उष्णतेचे वाढणारे प्रमाण व हवामानातील बदल यांची तीव्रता व परिणामकारकता कमी करणे, पर्यावरणाचा समतोल, संतुलन, संवर्धन आणि सुरक्षा राखण्याचे उद्दीष्ट साध्य करण्याच्या अनुषंगाने हरित क्षेत्र विकास विषयक प्रकल्प राबविण्यात येत असताना उपरोक्त प्रमाणे बाबींचा परामर्श सविस्तर प्रकल्प अहवालामध्ये करण्यात यावा.

१६. त्याअनुषंगाने सर्व संबंधित अधिकारी यांनी सदर परिपत्रकामध्ये दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने आवश्यक कार्यवाही करावी.

०२. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७१५१६२२१८३५२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pandurang Jotiba Jadhav

Digitally signed by Pandurang Jotiba Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=Pandurang Jotiba Jadhav
Date: 2017.07.15 17:20:56 +05'30'

**(पां.जो.जाधव)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव
३. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (१) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
८. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र नागरी अभियान संचालनालय, मुंबई.
९. महालेखापाल कार्यालय, महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर.
१०. सर्व विभागीय आयुक्त
११. सर्व जिल्हाधिकारी
१२. मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा
१३. मुख्याधिकारी, सर्व नगरपंचायती
१४. निवड नस्ती (नवि-१६)

*****